**परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन /राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेंतर्गत सानुग्रह अनुदान मंजूर करण्याबाबत.**
**दिवंगत संदिप हरीदास टेकाडे, महसूल सहायक, तहसिल कार्यालय, खामगांव,जि. बुलडाणा.**




**महाराष्ट्र शासन**
महसूल व वन विभाग,
मंत्रालय (मुख्य इमारत), १ ला मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२.

दूरध्वनी क्र ०२२-२२७९३६२७. Email ID : vikram.nikam@nic.in


---

**क्रमांक : अनुदान-२०२२/प्र.क्र.१४९/ई-७** **दिनांक : २९ मार्च, २०२३.**

**वाचा :-** १. शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक :- अंनियो-२०१७/प्र.क्र.२९/सेवा-४, दि.२९.०९.२०१८.
२. जिल्हाधिकारी कार्यालय, बुलडाणा यांच्याकडून प्राप्त झालेला क्र.कावि/लेखा-२.१/१०७/ २०२२, दि.२०.०६.२०२२ रोजीचा सानुग्रह अनुदान मंजुरीचा प्रस्ताव.
३. दिवंगत संदिप हरीदास टेकाडे, महसूल सहायक यांनी नामनिर्देशित केलेली व्यक्ती श्रीमती प्रियंका संदिप टेकाडे यांचा परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना/राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेंतर्गत सानुग्रह अनुदान मिळण्याकरीता प्राप्त झालेला दि.२८.०४.२०२२ रोजीचा अर्ज.

## आदेश

उपरोक्त क्रमांक २ अन्वये, जिल्हाधिकारी बुलडाणा यांच्याकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावासोबत श्रीमती प्रियंका संदिप टेकाडे यांच्या उपरोक्त क्र.३ येथे नमूद केलेल्या अर्जाच्या अनुषंगाने, प्रशासकीय विभाग प्रमुख हे त्यांना संदर्भ क्रमांक १ येथील वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : अंनियो-२०१७/ प्र.क्र.२९/सेवा-४, दि.२९ सप्टेंबर, २०१८ अन्वये प्राप्त झालेल्या अधिकारानुसार, दिवंगत संदिप हरीदास टेकाडे, महसूल सहायक, तहसिल कार्यालय, खामगांव, जि.बुलडाणा यांचे नामनिर्देशित व्यक्ती श्रीमती प्रियंका संदिप टेकाडे यांना सानुग्रह अनुदान रूपये १०,००,०००/- (अक्षरी रूपये दहा लाख फक्त) मंजूर करीत आहेत.

सदर " सानुग्रह अनुदान " शासकीय कर्मचारी सेवेत असताना १० वर्षे शासन सेवा होण्यापूर्वी दिनांक १९.११.२०२१ रोजी मृत्यू पावल्यामुळे मंजूर करण्यात येत आहे. सदर आदेश आदेशाच्या दिनांकापासुन १ वर्षे कालावधीसाठी ग्राह्य राहतील.

सदरचा खर्च " मागणी क्र.जी-६ २०७१-निवृत्तीवेतन व इतर सेवानिवृत्ती लाभ ०१ नागरी, १०३, अनुकंपा भत्ते, (००)(०६)-परिभाषित अंशदान/राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेंतर्गत सानुग्रह अनुदान (२०७१०७२२) " या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

सदर शासन आदेश, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संकेतांक २०२३०३२९१७१४११६८१९ असा आहे. हे आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

SANJAY BANKAR

Digitally signed by SANJAY BANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c8a7d6860ff227fd9e69a02e9ca5dfb2ccb25eda92d749629970f349fc6ed260, pseudonym=B37546F6A6BD466ED45270ED708F924F51A07EA8, serialNumber=C5917E56B0DA516AB259D846D516CB0584DCE5E9A2E73C0A35FA47BAB64E88AA, cn=SANJAY BANKAR
Date: 2023.03.29 17:20:00 +05'30'

**( संजय बनकर )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. जिल्हाधिकारी कार्यालय, बुलडाणा,
२. जिल्हा कोषागार अधिकारी कार्यालय, बुलडाणा,
३. तहसिलदार, खामगांव, जि.बुलडाणा.
४. श्रीमती प्रियंका संदिप टेकाडे, (जिल्हाधिकारी, बुलडाणा यांच्यामार्फत)
५. निवडनस्ती ( ई-७ ).